भूमिसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम "२८-अ" बाबत जिल्हाधिकारी यांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रः-संकिर्ण-०६/२०१५/प्र.क्र.८२/अ-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ४००० ३२

दिनांक :- २९ ऑगस्ट, २०१५

वाचा:- १) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक:-एलक्यून-१०९४/१६६/प्र.क्र.४३९/अ-२, दिनांक २० ऑक्टोबर, १९९५

२) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक:-एलक्यून-१०९८/प्र.क्र.२८/अ-२, दिनांक २५ मार्च, १९९८

३) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक:-संकीर्ण-०२/२०१०/प्र.क्र.२९/अ-२, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१०

४) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक:-संकीर्ण-०२/२०१०/प्र.क्र.२९/अ-२, दिनांक १४ सप्टेंबर, २०१२

**परिपत्रक :-**

भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम "२८-अ" खाली प्राप्त झालेले अर्ज निकाली काढण्यास होणाऱ्या दिरंगाईस आळा घालण्याच्या दृष्टीकोनातून व तसेच दिरंगाईमुळे शासनाच्या तिजोरीवर पडणारा अतिरिक्त भार रोखण्याच्या दृष्टीने सदरचे अर्ज तातडीने निकाली काढण्याबाबत यापूर्वी उपरोक्त नमूद शासन परिपत्रकानुसार सूचना देण्यात आल्या आहेत, भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम "२८-अ" बाबत जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या स्तरावर कार्यवाही करणे आवश्यक आहे, परंतु शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, जिल्हाधिकारी कलम "२८-अ" बाबत त्यांचे स्तरावर कार्यवाही न करता असे प्रस्ताव शासनास पाठवितात, असे प्रस्ताव शासनाकडे पाठविल्यामुळे कलम "२८-अ" च्या न्यायालयाच्या निवाडयाच्या आधारे निर्धारित रकमेत विलंब झाल्यामुळे त्याच्या व्याजाचा मोठया प्रमाणात भुर्दंड शासनावर पडतो. सदर वस्तुस्थिती लक्षात घेता कलम "२८-अ" च्या अनुषंगाने कार्यवाही करण्यासाठी सर्व जिल्हाधिका-यांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. मा. न्यायालयाने निर्देशित केल्याप्रमाणे कलम "२८-अ" बाबत आवश्यक असणारी कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी त्यांचे स्तरावर तातडीने पूर्ण करावी.

२. जिल्हाधिकारी यांनी कलम "२८-अ" बाबतची कार्यवाही विनाविलंब करुन शासनावर अतिरिक्त आर्थिक बोजा पडणार नाही याची जबाबदारी घ्यावी.

३. ज्या प्रकरणांत भूमिसंपादन अधिनियमाच्या कलम १८ खालील संदर्भामध्ये न्यायालयाने दिलेल्या निर्णयाविरुध्द अपिल दाखल न करण्याचा निर्णय घेतला असल्यास न्यायालयीन निर्णयाच्या अनुषंगाने जमीनमालकांनी कलम "२८-अ" खाली केलेल्या अर्जावर निवाडा तयार करुन जमीनमालकांना मोबदला अदा करण्यात यावा.

४. भूमिसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ खालील संदर्भावर वरिष्ठ न्यायालयाकडे अपील केलेल्या प्रकरणांत न्यायालयाने दिलेल्या निर्णयाच्या अंमलबजावणीस वरिष्ठ न्यायालयाकडून स्थगिती हुकूम दिले गेले असल्यास भूमिसंपादन अधिनियमाच्या कलम "२८-अ" खाली निवाडा जाहीर करण्यात येऊ नये.

५. भूमिसंपादन अधिनियमाच्या कलम १८ खालील संदर्भामध्ये न्यायालयाने दिलेल्या निर्णयाविरुध्द वरिष्ठ न्यायालयामध्ये अपिल प्रलंबित असताना वा अपिल दाखल करावयाचे प्रस्तावित असताना काही वेळी जमीनमालक कलम "२८-अ" खाली केलेल्या अर्जामध्ये मोबदला त्वरीत मिळावा, म्हणून न्यायालयात अपिल दाखल करतात, अपिलामध्ये न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार कलम "२८-अ" प्रमाणे निवाडा तयार करुन जमीनमालकांना मोबदला अदा करणे आवश्यक आहेत. अशावेळी कलम १८ च्या संदर्भामध्ये न्यायालयाने दिलेल्या आदेशाविरुध्द केलेल्या अपिलावरील, निर्णय शासनाच्या बाजूने लागण्याची शक्यता ध्यानी घेऊन संबंधित जमिनमालकांना प्रदान केलेल्या अतिरिक्त रकमांची वसुली शक्य व्हावी म्हणून कलम "२८-अ" खाली जाहीर केलेल्या निवाडयाप्रमाणे संबंधितांना मोबदला अदा करण्यापूर्वी देय रकमेएवढया रकमेची बॅंक गॅरेंटी संबंधीत जमीनमालकांकडून घेण्यात यावी. बॅंक गॅरंटी घेतल्याशिवाय जमीनमालकांना मोबदल्याची रक्कम अदा करण्यात येऊ नये. सदर बॅंक हमी ही कोणत्याही राष्ट्रीयकृत बॅंकेची असावी आणि हमी अपिलावर न्यायालयाच्या अंतिम निर्णय लागेपर्यंतच्या कालावधीसाठी घेण्यात यावी. शिवाय अशा बॅंक हमी बरोबरच अपिलात शासनाच्या बाजूने निर्णय लागल्यास त्या निर्णयाप्रमाणे अतिरिक्त मोबदल्याची रक्कम तातडीने शासनाला परत करण्यात येईल, असे प्रतिज्ञापत्रही संबंधिताकडून घेण्यात यावे.

६. भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम "२८-अ" खालील प्राप्त झालेल्या अर्जावर संबंधित प्राधिकृत अधिकाऱ्यांनी विनाविलंब कार्यवाही करावी, सदरहू कार्यवाही विहीत कालावधीत पूर्ण न केल्यास, संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांना वैयक्तीकरित्या जबाबदार धरण्यात यावे.

७. सदर शासन परिपत्रक सर्व जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणण्याची कार्यवाही तातडीने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१५०८२९११४९३९७४१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUBHASH KISANRAO GAWADE

Digitally signed by SUBHASH KISANRAO GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SUBHASH KISANRAO GAWADE
Date: 2015.08.29 13:03:08 +05'30'

**( सु.कि.गावडे )**

महाराष्ट्र शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व जिल्हाधिकारी
३. संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमि अभिलेख, पुणे
५. सर्व भूसंपादन विशेष भूसंपादन अधिकारी
६. निवडनस्ती (अ-२)